**नदीजोड प्रकल्प -जोड कालवा अमरावती मध्यम प्रकल्प ते ल. पा. योजना, अमरावती नाला ता.जि.नंदुरबार या योजनेच्या कामास रुपये रु.१४.७० कोटी किंमतीस प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सुप्रमा २०२१/(१९७/२०२१)/लपा**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०७ मार्च, २०२२

**पहावे :-**

१) जिल्हा नियोजन समिती, जिल्हाधिकारी, नंदुरबार यांचे पत्र क्र.जिनिसनं/जिवायो (सर्वसाधारण)/अमरावती प्रकल्प/सन-२०२०-२१/३४१, दि.२५/०३/२०२१.
२) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव जा.क्र.कासं/तापाविम/प्रशा-२/६११/ सन-२०२२ दिनांक १०/०२/२०२२.
३) जिल्हा नियोजन समिती, जिल्हाधिकारी, नंदुरबार यांचे पत्र क्र.जिनिसनं/जिवायो (सर्वसाधारण)/अमरावती प्रकल्प/सुप्रा/सन-२०२०-२१/१७६, दि.१६/०२/२०२२.

**प्रस्तावना:-**

नदीजोड प्रकल्प-जोड कालवा अमरावती मध्यम प्रकल्प ते ल. पा. योजना, अमरावती नाला ता.जि.नंदुरबार या प्रकल्पास नंदुरबार जिल्ह्याच्या जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) नाविन्यपूर्ण योजना अंतर्गत जिल्हाधिकारी तथा सदस्य, जिल्हानियोजन समिती नंदुरबार यांनी पत्र क्र.जिनिसनं/वापो १०-११/प्रमा/संस-२ /२९४ दि.०५.०३.२०११ अन्वये रू.१.४२ कोटी किंमतीस दरसूची २००९-१० नुसार मुळ प्रशासकीय मान्यता दिलेली होती. तसेच जिल्हाधिकारी तथा सदस्य जिल्हा नियोजन समिती, नंदुरबार यांनी पत्र क्र.जिनिसनं/ नदीजोड/सुधाप्रमा / संस-१/५५३ दि.३१.३.२०११ अन्वये रू.४.९५ कोटी किंमतीस दरसूची २००९-१० नुसार सुधारीत प्रशासकीय मान्यता दिलेली होती. सुधारीत प्रशासकीय मान्यता मिळाल्यानंतर ५ वर्षा पेक्षा जास्त कालावधी झाल्याने सुप्रमा संपुष्ठात आलेली आहे. या प्रकल्पासाठी लागणारा निधी नियोजन विभागामार्फत उपलब्ध होणार आहे.

अमरावती मध्यम प्रकल्प ते ल.पा. योजना अमरावती नाला जोड कालवा, जि. नंदुरबार हा प्रकल्प तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव अंतर्गत अवर्षण प्रवण क्षेत्रातील आहे. सदर प्रकल्पांतर्गत बांधुन पुर्ण झालेले अमरावती मध्यम प्रकल्प व अमरावती नाला ल.पा. प्रकल्प यांना जोडणाऱ्या जोडकालव्याचा समावेश आहे. अमरावती नाला ल.पा. योजनेचे पाणलोट व लाभक्षेत्र अवर्षणप्रवण क्षेत्रातील आहे. त्यामुळे या प्रकल्पात पुरेसे पाणी सिंचनासाठी उपलब्ध होत नाही. अमरावती नाला ल.पा. प्रकल्पाची घळभरणी सन २००४ मध्ये झालेली आहे. आजापर्यंत केवळ सन २००६ या वर्षीच धरण पुर्ण क्षमतेने भरलेले आहे. याकरिता या प्रकल्पापासुन ८ किमी अंतरावर असलेल्या व सन २००५ मध्ये पुर्ण झालेल्या अमरावती मध्यम प्रकल्पातील पाणी प्रकल्पाच्या डाव्या कालव्याच्या सा.क्र.३३७० मधुन जोड कालवा काढून अमरावती नाला ल.पा योजनेत सोडण्याचे प्रस्तावित आहे. अमरावती मध्यम प्रकल्पाचा सांडवा द्वारसहीत असुन ९ आगस्ट पर्यंत अतिरिक्त पाणी सोडण्यासाठी अमरावती मध्यम प्रकल्पाचे दरवाजे उघडे ठेवलेले असतात (Crest level २२०.७० mtr.). ९ आगस्ट ते १० सप्टेंबर पर्यंत दरवाज्यांच्या ¾ उंची पर्यंत म्हणजेच २२४.४५ मी. पर्यंत पाणी अडविले जाते. त्यामुळे या कालावधीतील सांडव्यावरुन वाहून जाणारे पाणी जोडकालव्याद्वारे अमरावती नाला ल.पा योजनेच्या पाणलोट क्षेत्रातील अमरावती नाल्यात सोडण्यात येणार आहे. अमरावती मध्यम प्रकल्पाच्या डाव्या कालव्याचा संकल्पीत विसर्ग १.१९ घमी प्रती सेंकद इतका आहे. या कालव्याद्वारे पावसाळ्यातील सांडव्यावरुन वाहून जाणारे पाणी ६० दिवसात (म्हणजे १५ ऑक्टोंबर पर्यंत) ६.१७ दलघमी पाणी वाहून नेण्याचे प्रस्तावित आहे. तसेच ज्यावर्षी परर्जन्यमान जास्त असेल तेंव्हा

जुलै महिन्यापासुन १५ ऑक्टोंबर पर्यंत म्हणजे ९० दिवसात ९.२६ दलघमी पाणी वळविणे शक्य आहे. याद्वारे अमरावती ल.पा. प्रकल्पाची लाभक्षेत्रातील ८३८ हे. सिंचन क्षेत्राची स्थिरीकरण होणार आहे.

यासाठी प्रकल्पाचे सन २०१९-२० च्या दरसूचीवर आधारीत रू.१४.७० कोटी इतक्या किंमतीच्या प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या प्रस्तावावर राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीच्या दि.०४/०१/२०२२ रोजी संपन्न झालेल्या १६७ व्या बैठकीत सहमती प्राप्त झाली आहे. या किंमतीस तापी महामंडळाची सहमती आहे. परंतु जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती, नंदूरबार यांचेकडून रू.१३९७.५२ लक्ष इतका निधी उपलब्ध करून देणार आहेत.

नदीजोड प्रकल्प-जोड कालवा अमरावती मध्यम प्रकल्प ते ल. पा. योजना, अमरावती नाला ता.जि.नंदुरबार या प्रकल्पाच्या किमतीत झालेली वाढ ही पुढील बाबींमुळे झाली आहे दरसूचीतील बदलामुळे झालेली वाढ, जादा दराची निविदा स्वीकृतीमुळे झालेली वाढ, भूसंपादन किंमतीतील वाढ, इतर कारणांमुळे झालेली वाढ व अनुषंगिक खर्च इत्यादीमुळे झालेली आहे. तसेच सदर प्रकल्प लाभव्यय गुणोत्तर व आर्थिक परतावा दराच्या मापदंडात बसत आहे. प्रकल्पास जलसंपदा विभाग दरसूची २०१९-२० वर आधारित राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीने सहमती दिलेल्या रु.१४.७० कोटी इतक्या किंमतीस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा निर्णय खालीलप्रमाणे घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

नदीजोड प्रकल्प-जोड कालवा अमरावती मध्यम प्रकल्प ते ल. पा. योजना, अमरावती नाला ता.जि.नंदुरबार, या प्रकल्पास जलसंपदा विभाग दरसूची २०१९-२० वर आधारित रु.१४.७० कोटी (चौदा कोटी सत्तर लक्ष फ़क्त) इतक्या किंमतीस (प्रत्यक्ष कामासाठी रु.१३.९८ कोटी व अनुषंगीक खर्च रू.०.७२ कोटी) खालील अटींच्या अधीन राहून प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. प्रकल्पाचा उपशिर्ष निहाय तरतूदींचा गोषवारा परिशिष्ट - "अ" मध्ये सोबत जोडला आहे.

१) सदर प्रकल्पाच्या प्रथम सु प्र मा प्रस्तावामध्ये अंतर्भुत किंमतीस तांत्रिक मान्यता प्राप्त करुन घ्यावी.
२) प्रकल्पाची अंमलबजावणी करतांना प्रचलित शासन निर्णय, नियम, CVC तत्वे, वित्तीय मर्यादा, विहित निविदा कार्यपध्दती यांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.
३) प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याच्या निर्णयामुळे या प्रकल्पाबाबत सुरु असलेल्या अथवा भविष्यात उद्भवणाऱ्या विभागीय चौकशीच्या कार्यवाहीस कोणतीही बाधा पोहचणार नाही, ती कार्यवाही तशीच चालू ठेवावी.
४) संपूर्ण प्रकल्प हा प्रस्तावित प्रथम सु. प्र. मा. किंमतीच्या मर्यादेत पूर्ण करावा.
५) सुधारित प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रीक बाबी अथवा निविदाविषयक क्षेत्रीय स्तरावरील निर्णयास किंवा झालेल्या क्षेत्रीय अनियमिततेस मान्यता गृहीत धरली जाणार नाही. तसेच सुधारित प्रशासकीय मान्यता देणारे प्राधिकारी हे झालेल्या क्षेत्रीय निर्णयास व अनियमिततेस जबाबदार नसतील याबाबतची जबाबदारी निर्णय घेणाऱ्या क्षेत्रीय अधिकाऱ्यांची राहील, अशा तांत्रीक व निविदा विषयक प्रकरणांची तपासणी त्यावेळी प्रचलित शासन निर्णयानुसार करणे आवश्यक राहील.
६) सदर प्रकल्पावर लाभधारकांची पाणी वापर संस्था स्थापन करण्यात यावी.

या योजनेच्या कामावरील खर्च मागणी “इतर जिल्हा योजने अंतर्गत (३४५१) जिल्हा नियोजन समिती, नंदुरबार/धुळे” या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

नियोजन विभागाच्या क्रमांक ससमा-२०१०/प्र.क्र. ४८(भाग-१) का १४६१, दिनांक ११/०६/२०१८ नुसार रुपये १५ कोटी किंमतीच्या खालील प्रत्येक कामास मंजूरी देण्याचे अधिकार संबंधित प्रशासकीय विभागास आहेत.सदर शासन निर्णयात दिलेल्या अधिकारानुसार जलसंपदा या प्रशासकीय विभागाच्या तसेच मा.मंत्री, (जलसंपदा) यांच्या मान्यतेने सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता लपा कार्यासनाच्या प्रशासकीय मान्यता नोंदवहीत २२८ या अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२२०३०७१७४४५११४२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUSHMA RAJEEV KUDAL

Digitally signed by SUSHMA RAJEEV KUDAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=141f90147d17022d798b6637e56a21addf9ccec2a8e873c94cc236bef5f7f1ba, pseudonym=F502745DAE0A188EA35CEF7CBBA863E3F275CE05, serialNumber=C8CC8BFFF37E7B2B7D657FAC2292A9D0123EC09BF0611AA0BFBE88FE5600C519, cn=SUSHMA RAJEEV KUDAL
Date: 2022.03.07 17:48:02 +05'30'

**( सुषमा कुडल )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**सहपत्र :- परिशिष्ट "अ"**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
३. सर्व मा.मंत्री / मा.राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४. मा. विरोधी पक्ष नेते, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र राज्य, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
६. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७. वित्त विभाग (व्यय- १२), मंत्रालय, मुंबई -३२.
८. नियोजन विभाग (कार्यासन १४८१), मंत्रालय, मुंबई -३२.
९. जिल्हाधिकारी, नंदुरबार
१०. जिल्हाधिकारी, धुळे
११. कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव
१२. महासंचालक, संकल्पचित्र, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व धरण सुरक्षा, नाशिक.
१३. मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव
१४. आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१५. उप सचिव (निवसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१६. अधिक्षक अभियंता, धुळे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, धुळे
१७. अर्थ शाखा - १ व २, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
१८. ल.पा. कार्यासन (संग्रहार्थ).

## परिशिष्ट-अ

नदीजोड प्रकल्प-जोड कालवा अमरावती मध्यम प्रकल्प ते ल. पा. योजना, अमरावती नाला ता.जि.नंदुरबार,
शासन निर्णय क्रमांकः शासन निर्णय क्रमांकः सुप्रमा २०२१/(१९७/२०२१)/लपा, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,
दिनांक : ०७ मार्च, २०२२

| **अ.क्र** | **उपशीर्ष** | **प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता (दरसूची सन २०१९-२०) रू.कोटी** |
|---|---|---|
| १ | अ प्राथमिक | ०.०५ |
| २ | ब- भूसंपादन | ५.२७ |
| ३ | क कामे ते ल मातीकाम- कालवा | ८.६६ |
| ४ | अनुषंगिक खर्च | ०.७२ |
| | **एकुण** | **१४.७०** |